**महाराष्ट्र शासन**

**तात्काळ**

**सामान्य प्रशासन विभाग**
**दालन क्र.५५७ (विस्तार), ५वा मजला,**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.**

**दूरध्वनी :**(०२२) २२०२४५८५, २२७९३३४४. **फॅक्स :** (०२२)२२०२७३६५.
***E_mail:***GAD_१४A/Services/Gad/Mantralaya/Maharashtra@Maharashtra

क्रमांक : **एएससी -१५११/प्र.क्र.५८/११/१४अ** दिनांक **२५ मे, २०११**

## आदेश

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ अन्वये खाली नमुद केलेल्या मंत्रालयीन विभागातील लघुटंकलेखकांच्या आंतरविभागीय बदल्या करण्यात येत असून त्यांच्या नावासमोरील स्तंभ-४ मध्ये दर्शविलेल्या विभागात त्यांची पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र. | लघुटंकलेखकाचे नाव | सद्याचा विभाग | बदलीनंतर पदस्थापनेचा विभाग |
|---|---|---|---|
| १ | श्रीमती स्मि.वि.महाडीक(म) | गृहनिर्माण विभाग | सार्वजनिक बांधकाम विभाग |
| २ | श्री दि.रा. आरमोरीकर(म) | सार्वजनिक बांधकाम विभाग | गृहनिर्माण विभाग |

२. **बदलीच्या आदेशाची अंमलबजावणी तात्काळ व कार्यक्षमरित्या होण्याकरिता खालील सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.**

(१) बहुतेक विभाग बदलीबाबतचे आदेश प्राप्त झाल्यानंतर बदली करण्यात आलेल्या कर्मचा-यांना त्वरीत कार्यमुक्त न करता त्यांचे पर्यायी कर्मचारी रुजू होण्याची वाट पाहतात. त्यामुळे बदलीच्या आदेशांची अंमलबजावणी होण्यास विलंब होतो. वास्तविक पाहता प्रत्येक विभागाने त्यांच्या विभागातील बदली झालेल्या कर्मचाऱ्यांना तात्काळ कार्यमुक्त केल्यास सर्वच बदली आदेशांची अंमलबजावणी त्वरीत होऊ शकेल. **यास्तव सर्व विभागांनी पर्यायी कर्मचारी हजर होण्याची वाट न पाहता बदली झालेल्या कर्मचा-यांना विनाविलंब कार्यमुक्त करावे.**

(२) बदली झालेले कर्मचारी त्यांच्या संबंधित विभागातून कार्यमुक्त होऊन रुजू होण्यासाठी आल्यानंतर त्यांना विनाविलंब रुजू करुन घ्यावे. **एखाद्या कर्मचा-याला रुजू करुन न घेतल्यामुळे सक्तीचा प्रतीक्षा काळ ठरवून काम न देता व भत्ते देण्याचा प्रसंग उद्‌भवल्यास संबंधित विभागाच्या आस्थापना अधिका-याला जबाबदार धरण्यात येईल.**

(३) बदलीच्या आदेशात बदल करुन घेण्यासाठी कोणत्याही कर्मचा-याने प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास असे कर्मचारी शिस्तभंग विषयक कारवाई करण्यास पात्र ठरतील.

(४) सदर बदल्यांची अंमलबजावणी प्रभावीपणे होणे गरजेचे असल्यामुळे बदली झालेल्या सर्व कर्मचा-यांचे कार्यमुक्ततेच्या दिनांकापर्यंतचे व जास्तीत जास्त दि.३१ मे २०११ पर्यंतचे वेतन ते सध्या कार्यरत असलेल्या विभागाने काढावे. दि. १ जून २०११ पासूनचे वेतन कोणत्याही परिस्थितीत बदलीपूर्वीच्या विभागाकडून काढण्यात येऊ नये, सदर वेतन संबंधित कर्मचारी बदलीच्या विभागात हजर झाल्यानंतर बदलीनंतरच्या विभागाने काढावे व तसा अहवाल सामान्य प्रशासन विभागास सादर करावा. दि.१ जून २०११ नंतरचे वेतन बदलीपूर्वी कार्यरत असलेल्या विभागातील आहरण व संवितरण अधिका-याने अदा केल्यास त्यांना व्यक्तिश: जबाबदार धरण्यात येईल अशा सूचना सर्व प्रशासकीय विभागांना देण्यात येत आहेत. तसेच बदली केलेल्या सर्व कर्मचा-यांचे दि.३१/५/२०११ पर्यंतचे वेतन सध्या कार्यरत असलेल्या विभागाने अदा करावयाचे असून दि.१/६/२०११ पासूनचे वेतन बदली झालेल्या विभागामार्फत अदा करावयाचे असल्याबाबत अधिदान व लेखा अधिकारी मुंबई यांनाही कळविण्यात येत आहे.

हे आदेश तात्काळ अंमलात येतील. बदली झालेल्या लघुटंकलेखकांना संबंधित विभागाने तात्काळ कार्यमुक्त करुन या विभागास कळवावे. तसेच बदली झालेल्या लघुटंकलेखकांनी त्यांची पदस्थापना केलेल्या विभागात तात्काळ रुजू व्हावे.

सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आला असून याचा संगणक क्र. २०११०५२५१५२५३४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

**( अ.तु.खोत )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

संबंधित लघुटंकलेखक, मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

प्रत,

मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
अ.मु.स./प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
सह/उप सचिव (आस्थापना), सर्व मंत्रालयीन विभाग,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

२. त्यांना कळविण्यात येते की, बदली केलेल्या सर्व कर्मचाऱ्यांचे दि.३१.०५.२०११ पर्यन्तचे वेतन सध्या कार्यरत असलेल्या विभागामार्फत अदा करावयाचे आहे. दि.०१.०६.२०११ नंतरचे वेतन बदली झालेल्या विभागामार्फत अदा करावयाचे आहे. सदर सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

प्रत, आहरण व संवितरण अधिकारी, सर्व मंत्रालयीन विभाग,

२. त्यांना कळविण्यात येते की, बदली केलेल्या सर्व कर्मचाऱ्यांना दि.३१.०५.२०११ पूर्वी कार्यमुक्त करणे अत्यावश्यक असून, कार्यमुक्त केलेल्या दिनांकापर्यन्तचे वेतन सध्या कार्यरत असलेल्या विभागाने काढावे. त्यानंतरचे वेतन बदलीपूर्वी कार्यरत असलेल्या विभागातील संबंधित आहरण व संवितरण अधिकाऱ्याने अदा केल्यास त्यांना याबाबत व्यक्तिशः जबाबदार धरण्यात येईल व त्यांच्याविरुध्द नियमानुसार योग्य ती कारवाई करण्यात येईल.

प्रत, निवडनस्ती का.१४-अ, / का.१४-अ, संग्रहार्थ